दूधगंगा प्रकल्पांतर्गत कोल्हापूर जिल्हयातील कागल, करवीर, शिरोळ व हातकणंगले तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांसाठी निधी मंजुरीबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१७/३२२/प्र.क्र.८४/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १२/०६/२०१८

**वाचा -**

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि. १७/४/२०१५
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
५) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/१७३/२०१३, दि. २२/०७/२०१३
६) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/१७३/२०१३, दि. १८/०७/२०१३
७) जिल्हाधिकारी कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/२१८/२०१३, दि. १८/०७/२०१३
८) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/२५७/२०१३, दि. १८/०७/२०१३
९) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/४८/२०१३, दि. २३/०७/२०१३
१०)जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/ (५)/पुनर्वसन/ आरआर/ ४७,११८,५३८/१३, दि. २२/०७/२०१३
११)जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/१६३/२०१३, दि. १८/०७/२०१३
१२)जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र. कार्यासन-१५/(५)/पुनर्वसन/आरआर/९४/२०१३, दि. २३/०७/२०१३
१३)विभागीय आयुक्त, पुणे यांचे आदेश क्र. पुनर्व/कावि-४/१०/२०१०, दि. २६/०२/२०१०
१४)शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं.२०१५/२११/प्र.क्र.३५/र-८, दि. ०१/०९/२०१५
१५)विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/कावि३/१३६३/२०१७, दि. २०/०९/२०१७
१६) शासन पत्र क्र. पुनर्व-२०१७/३२२/प्र.क्र.८४/र-८, दि. ०३/११/२०१७.
१७)विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/उपले/आर आर/३७२/२०१८, दि. १६/०४/२०१८

**प्रस्तावना -**

दूधगंगा प्रकल्पांतर्गत कोल्हापूर जिल्हयातील कागल, करवीर, शिरोळ व हातकणंगले तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ५ ते १३ येथील आदेशान्वये विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांचे स्तरावरुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेंअंतर्गत पूर्ण/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांकरिता मोघम निधी मागणी प्रस्ताव

विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. १५ येथील पत्रान्वये शासनास सादर केला होता. तदनंतर निधी मागणी प्रस्ताव विहीत प्रपत्र, प्रमाणपत्र/अहवालासह सादर करणेबाबत संदर्भाधिन शासन पत्र क्र.१६ अन्वये कळविण्यात आले होते. त्यास अनुसरुन, विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. १७ येथील पत्रान्वये दूधगंगा प्रकल्पांतर्गत कोल्हापूर जिल्हयातील कागल, करवीर, शिरोळ व हातकणंगले तालुक्यातील पूर्ण/ सद्यस्थितीत प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी रु. ४४.४४ लक्ष चा निधी मागणी प्रस्ताव सादर केला आहे.

२. तथापि, "सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पाने बाधित पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे" या योजनेअंतर्गत नागरी सुविधा कामांना त्यांच्या पुर्णत्वानुसार/प्रगतीनुसार निधी वितरीत करण्यात येत असल्याने, प्रस्तावाधिन ७०% पर्यंत प्रगतीपथावरील कामांना त्यांच्या प्रगतीनुसार तर ८०-९५% प्रगतीपथावरील/पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांना पूर्ण निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय -**

त्यानुसार, दूधगंगा प्रकल्पांतर्गत कोल्हापूर जिल्हयातील कागल, करवीर, शिरोळ व हातकणंगले तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पूर्ण/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी त्यांच्या प्रगतीच्या मर्यादेत रू. २४,०६,०००/- निधी सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, दूधगंगा प्रकल्पांतर्गत कोल्हापूर जिल्हयातील कागल, करवीर, शिरोळ व हातकणंगले तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पूर्ण/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.२४,०६,०००/- (रुपये चोवीस लक्ष सहा हजार फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) (कार्यक्रमावरील खर्च)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजूरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, दुधगंगा कालवे विभाग क्र. १, कोल्हापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत तसेच तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे व संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२१५४६३५२२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.06.12 15:46:38 +05'30'

**( दयानंद शं. मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, कोल्हापूर
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
७. कार्यकारी अभियंता, दूधगंगा कालवे विभाग क्र. १, कोल्हापूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *

**शासन निर्णय क्र. पुनर्व-२०१७/३२२/प्र.क्र.८४/र-८, दि. १२/०६/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**दूधगंगा प्रकल्पांतर्गत कोल्हापूर जिल्हयातील कागल, करवीर, शिरोळ व हातकणंगले तालुक्यातील पूर्ण/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांसाठी वितरीत निधीचा तपशील.**

| अ. क्र | पुनर्वसित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| **ता. कागल, जि. कोल्हापूर** | | | |
| १) | कागल | क्रीडांगणास संरक्षक भिंत बांधणे | २,६५,६६०/- |
| २) | कागल (बांबर्डे) | ग्रामपंचायत कार्यालय बांधणे | ३,०६,०००/- |
| ३) | कसबा सांगाव (वाकी) | पाणी, वीज व पोहोच रस्त्यासह स्मशानशेड बांधणे | ३,६८,०००/- |
| **ता. करवीर, जि. कोल्हापूर** | | | |
| ४) | मुडशिंगी | ग्रामपंचायत कार्यालय बांधणे | ५,९२,६००/- |
| **ता. शिरोळ, जि. कोल्हापूर** | | | |
| ५) | बांबराचीवाडी वसाहत दत्तवाड | ग्रामपंचायत कार्यालय बांधणे | २,५१,२६८/- |
| ६) | बांबराचीवाडी वसाहत दत्तवाड | बसथांबा शेड बांधणे | ३०,८३२/- |
| ७) | अब्दुल्ललाट | बसथांबा शेड बांधणे | १,२२,८००/- |
| ८) | कांबर्डे वसाहत आगर | बसथांबा शेड बांधणे | ४७,०४०/- |
| **ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर** | | | |
| ९) | पट्टणकोडोली | स्मशानशेड बांधणे | २,६३,०००/- |
| १०) | पट्टणकोडोली | बसथांबा शेड बांधणे | १,५८,८००/- |
| | | **एकूण** | **२४,०६,०००/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.06.12 15:47:40 +05'30'

**( दयानंद शं. मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**